नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(१४)/का-१४११,
मंत्रालय, मुं बई-४०० ०३२
दिनांक :- १४ मार्च, २०२४

वाचा :- १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३३/का-१४११, दि.२८ मार्च, २०२२,
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.२९ मार्च, २०२२,
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.७ जुलै, २०२२,
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३.

प्रस्तावना :-

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करण्यासाठी "महानगरपालिका क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" व "नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" या योजनांना वाचा येथील अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याअंतर्गत करावयाच्या कामांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. (२.४), ३, ४ व ७ येथील तरतुदींमध्ये वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली होती. तथापि, वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा रद्द करुन वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील तरतूदी वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये पुन:स्थापित करण्यात आल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या यादीतील विकास कामांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे (नगरपालिकानगरपंचायत/नगरपरिषद/)" या योजनेअंतर्गत शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार सिन्नर नगरपरिषद अंतर्गत सोबत दिलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या रू. १५.००कोटी एवढ्या किंमतीच्या कामांची थेट शासन स्तरावरून निवड करण्यात आली आहे. सदर कामांसाठी कार्यान्वयीन सार्वजनिक बांधकाम विभाग राहतील.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार उपरोक्त कामांना संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा यांनी तांत्रिक मान्यता व जिल्हाधिकारी, नाशिक यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता परिशिष्टातील रकमेच्या मर्यादेत असल्याची दक्षता जिल्हाधिकारी, नाशिक यांनी घ्यावी.

३. शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार सोबतच्या परिशिष्टातील कामांसाठी प्राप्त होणारे अनुदान वितरीत करण्याकरिता जिल्हाधिकारी, नाशिक यांच्या नावे स्वतंत्र बँक खाते उघडण्यात यावे. बँक खात्याचा तपशील (IFSC कोड व खाते क्रमांक) नियोजन विभागास सादर करावा. त्यानंतर सदर निधी उक्त बँक खात्यामध्ये सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, नाशिक / सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी संदर्भ क्र. (१) व (४) येथील शासन निर्णयामधील अन्य सर्व अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

५. या कामांसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.ओ-९, ३६०४, स्थानिक संस्था व पंचायतराज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकीत रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाई व अभिहस्तांकन,(०१)(०२), नागरी स्थानिक संस्थांना (नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत) सहायक अनुदान (३६०४ १०१८) (कार्यक्रम), ३१,सहायक अनुदान" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१३३८२५६५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA
DEVENDRA
CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.03.14 13:47:20 +05'30'

**( चारूशीला चौधरी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग,
२. जिल्हाधिकारी, नाशिक,
३. मुख्य अधिकारी, सिन्नर नगरपरिषद,
४. जिल्हा नियोजन अधिकारी, नाशिक,
५. मा.उप मुख्यमंत्री(वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
९. सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक,
१०. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

| | शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(१४)/का-१४११, दि. १४ मार्च, २०२४ सोबतचे परिशिष्ट | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **रक्कम (कोटीत)** |
| १ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. १ मधील अंतर्गत रस्ते कॉक्रीटीकरण करणे | १ कोटी |
| २ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. २ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | १.५० कोटी |
| ३ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. ३ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | १ कोटी |
| ४ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. ४ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | ०.५० कोटी |
| ५ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. ५ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | ०.५० कोटी |
| ६ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. ६ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | ०.५० कोटी |
| ७ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. ७ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | १ कोटी |
| ८ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. ९ मधील अंतर्गत रस्ते अनुषंगीक काम करणे | ३ कोटी |
| ९ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. १० मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | १ कोटी |
| १० | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र.११ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | १ कोटी |
| ११ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. ५ मध्ये श्रीकृष्ण मंदिर परिसर सुधारणा करणे | ०.५० कोटी |
| १२ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. १२ मध्ये अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | ०.५० कोटी |
| १३ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. १३ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | १ कोटी |
| १४ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. १४ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | १ कोटी |
| १५ | सिन्नर नगरपरिषद प्रभाग क्र. १५ मधील अंतर्गत रस्ते सुधारणा करणे | १ कोटी |
| | **एकूण** | **१५ कोटी** |